आरोग्यवर्धिनी केंद्रामध्ये नियुक्त होणाऱ्या आयुर्वेद पदवीधारकांसाठी महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक अंतर्गत सहा महिन्याच्या प्रशिक्षण अभ्यासक्रमास मान्यता देणे व त्यानुषंगाने इतर अनुषंगिक बाबींसाठी केंद्र शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचना/ निकष यांच्या पालनाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमईडी १०१८/प्र.क्र.२७०/१८/भाग २/शिक्षण-२**

९ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: १६ जानेवारी, २०२०.

**वाचा:-**

१) आरोग्य व कुटूंब कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. झेड -१५०१५/ ४/ २०१९ - एनएचएम - आय, दिनांक २५/११/२०१९.

२) शासन शुध्दिपत्रक क्रमांक: एमईडी १०१८/प्र.क्र.२७०/१८/शिक्षण-२, दिनांक ०२/०८/२०१९.

३) शासन शुध्दिपत्रक क्रमांक: एमईडी १०१८/प्र.क्र.२७०/१८/शिक्षण-२, दिनांक २१/०९/२०१८.

४) शासन निर्णय क्रमांक: एमईडी १०१८/प्र.क्र.२७०/१८/शिक्षण-२, दिनांक ०९/०८/२०१८.

**प्रस्तावना:-**

राष्ट्रीय आरोग्य धोरण,२०१७ मध्ये जनतेस गुणवत्तापूर्ण प्राथमिक आरोग्याची सेवा पुरविण्याचा केंद्र शासनाने निर्णय घेतला असून त्यानुसार सदर सेवा मुख्यत्वे आरोग्यवर्धिनी केंद्र (Health and Wellness Centre) यांच्यामार्फत पुरविणे अभिप्रेत आहे. आरोग्यवर्धिनी केंद्रामार्फत जनतेस व्यापक प्रमाणात प्राथमिक आरोग्य सेवा (Comprehensive Primary Health Care) पुरविण्याचा मानस असून फेब्रुवारी, २०१८ मध्ये भारत सरकारने संपूर्ण देशात १.५ लक्ष प्राथमिक आरोग्य केंद्रे व उपकेंद्रांचे रुपांतर आरोग्यवर्धिनी केंद्रात करण्याचे ठरविले आहे.

महाराष्ट्र राज्यातील आरोग्यवर्धिनी केंद्रांमध्ये आयुर्वेदिक पदवीधारकांना मध्यमस्तरावरील सेवा प्रदाता (Midlevel Service Provider) म्हणून नेमण्यात येणार असून त्यासाठी नियुक्त होणाऱ्या आयुर्वेद पदवीधारकांना

आरोग्यवर्धिनी योजनेंतर्गत अपेक्षित सर्व सेवा देण्याबाबतचे प्रशिक्षण देण्यासाठी महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठामार्फत अभ्यासक्रम राबविण्यास दिनांक ०९/०८/२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच, संदर्भ क्र.२ व ३ वरील शासन शुध्दिपत्रकाद्वारे उक्त दिनांक ०९/०८/२०१८ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.२ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीमध्ये सुधारणा करण्यात आली आहे. आता, आरोग्यवर्धिनी केंद्र/उपकेंद्र स्तरावर समुदाय आरोग्य अधिकारी यांची अपेक्षित संख्येनुसार नियुक्ती डिसेंबर, २०२२ पर्यंत पूर्ण करण्याच्या दृष्टीने सार्वजनिक आरोग्य विभागाने या प्रयोजनार्थ निवडलेल्या ३०० किंवा त्यापेक्षा जास्त खाटा असलेल्या आरोग्य संस्थांमध्ये प्रशिक्षण क्षमता १२० करण्याची विनंती सार्वजनिक आरोग्य व कुटूंब कल्याण विभागाद्वारे करण्यात आली आहे. त्यानुषंगाने निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्यातील आरोग्यवर्धिनी योजनेंतर्गत आयुर्वेद पदवीधारकासाठीच्या महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठामार्फत राबविण्यात येणाऱ्या "आधुनिक मध्यमस्तरीय सेवा प्रदाता" या अभ्यासक्रमासाठी ३०० किंवा त्यापेक्षा जास्त खाटा असलेल्या संस्थांमध्ये १२० इतकी प्रवेशक्षमता राहिल. सदर संस्था ह्या सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत निवडण्यात येतील.

२. उक्त प्रयोजनार्थ संस्थांची निवड, प्रशिक्षकांची निवड, प्रशिक्षक : प्रशिक्षणार्थी प्रमाण तसेच इतर अनुषंगिक बाबींसाठी केंद्र शासनाच्या आरोग्य कुटूंब कल्याण मंत्रालयाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचना/निकष यांचे पालन करणे आवश्यक राहिल.

३. आरोग्यवर्धिनी केंद्रावर नियुक्त करावयाच्या मध्यमस्तर सेवा प्रदाता अभ्यासक्रमाच्या अनुषंगाने खाटांच्या संख्येनुसार प्रवेशक्षमता निश्चित करण्याबाबत यापुढे केंद्र शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनांप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी. त्याकरिता वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागामार्फत स्वतंत्र आदेश निर्गमित करण्याची आवश्यकता राहणार नाही. तथापि, यासंदर्भात वेळोवेळी करण्यात आलेल्या सुधारणांबाबत सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागास अवगत करण्यात येईल.

४. उक्त अभ्यासक्रम/प्रशिक्षण पूर्ण केल्यानंतर उत्तीर्ण उमेदवार हे आरोग्यवर्धिनी केंद्रावर काम करतील याबाबत आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी दक्षता घेणे आवश्यक राहिल.

५. सदर आदेश हे सार्वजनिक आरोग्य व कुटूंब कल्याण विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२००११६१५०५०८७२१३** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Surendra Pralhad Chankar

Digitally signed by Surendra Pralhad Chankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=MEDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=da74ced4daa59e5121be348655e71412ea68827bae27cd8d480eb3963ff77726, cn=Surendra Pralhad Chankar
Date: 2020.01.17 12:04:03 +05'30'

**(सुरेन्द्रं चानकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.मंत्री(वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
मा.विरोधी पक्ष नेता,महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
मा.राज्यमंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य व कुटूंब कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
सर्व सह सचिव/उप सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, फोर्ट, मुंबई
संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
संचालक (आरोग्य सेवा), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
संचालक, आयुष संचालनालय, मुंबई
कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक
निवडनस्ती (शिक्षण-२)